**मौजे ढवळी ता मिरज जि सांगली येथील पुरसंरक्षक भिंतीच्या बांधकामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-**२०२४/ (प्र.क्र.** ९९/**२०२४)/ सिं.व्य.(महसूल)**

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: १५ मार्च, २०२४

**वाचा :** १) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू १०९२/१७०-सिंव्य,(कामे) दिनांक ७/०८/ १९९२

२) शासन निर्णय क्र. पूसंभि २०१९/(प्र.क्र.११५/२०१९) सिंव्य.(म) दि.३१/८/२०१९

**प्रस्तावना :-**

मौजे ढवळी ता. मिरज जि. सांगली हे गाव सांगली जिल्हातील मिरज तालुक्यात वसलेले आहे. सन २००५-०६ व २००६-०७ तसेच २०१९-२० मध्ये अतिवृष्टी झालेने नदीस आलेल्या पुरामुळे सदर गावचे मोठ्या प्रमाणावर नुकसान झालेले होते. वारंवार पूरपरिस्थिती निर्माण होत असल्यामुळे नदीकाठी असणारी घरे, रस्ते, स्मशान भूमी यांचे नुकसान होत आहे. तसेच नदीकाठी असलेल्या जमिनीची धूप होवून जमीन खचत आहे. यानुसार क्षेत्रीय अधिका-यांनी प्रत्यक्ष पाहणी करून अंदाजपत्रक तयार करुन शासनास सादर केले आहे. अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत मौजे ढवळी ता. मिरज जि. सांगली येथील कृष्णा नदीवरील पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या कामासाठी रु. **४,६७,८२,७०९**/- (रु. चार कोटी सदुसष्ठ लाख ब्याऐंशी हजार सातशे नऊ) एवढया खर्चाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०२२-२३ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

क) शासन निर्णय क्रमांक पुसंभि-२०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/सिंव्य(म)दिनांक ३१/०८/२०१९ मधील तरतूदी नुसार कार्यवाही करावी.

ख) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे /संकल्पने, दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

ग) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे. या कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता दिली जाणार नाही.

घ) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे /संकल्पने, दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी. कामाचे संकल्पन सक्षम स्तरावरुन मान्यता घेऊनच तांत्रिक मान्यतेची कार्यवाही करण्यात यावी. सदर संकल्पनामुळे कामाच्या किंमतीत अथवा कार्यकक्षेत बदल होत असल्यास त्यास सक्षम स्तरावर मान्यता घेणे अनिवार्य राहील.

च) पूरसंरक्षक कामाच्या अंदाजपत्रकातील संकल्पनास सक्षम स्तरावर मान्यता प्राप्त झाल्याशिवाय कामाचे तांत्रिक मान्यतेचे आदेश देता येणार नाहीत.

छ) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधितांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची, दक्षता घ्यावी.

ज) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

झ) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक मौजे ढवळी ता. मिरज जि. सांगली येथील कृष्णा नदीकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास सांगली जिल्हा परिषद, सांगली ने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे.

ट) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे. पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची, दक्षता घ्यावी. तसेच कोणत्याही प्रकारचे सुशोभिकरन, सौंदर्यीकरण ची कामे करु नये.

ठ) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक भिंत मौजे ढवळी ता. मिरज जि. सांगली येथील जिल्हा परिषदेने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. काम सुरू करण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र प्राप्त करून घ्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च "४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे भागभांडवली अंशदान (४७११ ०२०९)" या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ४८/ सन २०२२ वर नोंदविण्यात आलेली आहे.

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका - १९७८ भाग पहिला मधील तरतुदीनंतर प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०३१६२०१८०९००२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.16 20:27:17 +05'30'

(सो.आ.गायकवाड)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुंबई.

३) मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा/वित्त व नियोजन) यांचे कार्यालय.

४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई

५) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई

७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

८) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,

९) प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

११) महालेखापाल-१ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

१२) महालेखापाल-२ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे,

१४) मुख्यअभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, पुणे

१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१६) अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली,

१७) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०२४/ (प्र.क्र. ९९/२०२४)/ सिं.व्य.(महसूल)

**दि. १५ मार्च, २०२४ चे सहपत्र**

**परिशिष्ट**

| Sr.No. | Particular | Amount ( Rs ) |
| --- | --- | --- |
| १ | Amount of Main work | ३७७५६२०३.०० |
| २ | १ % Insurance | ३७७५६२.०० |
| ३ | Add १८ % for GST | ६७९६११७.०० |
| ५ | Royalty charges | १८५२८२७.०० |
| | **Total Amount** | **४,६७,८२,७०९.००** |

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.16 20:27:38 +05'30'

**( सो.आ.गायकवाड )**

**शासनाच्या अवर सचिव**